GR-20040707130407001-0100

**पदविधर/पदविकाधारक सुशिक्षित बेरोजगारांना शासकीय/निमशासकीय सेवेतील गट-क मधील पदांवर नियुक्तीसाठी उच्च वयोमर्यादेत शिथिलता देण्याबाबत.**

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग
शासन निर्णय, क्र.पअंक-१००१/७२४/प्र.क्र.५४/२००१/१६-अ
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- १७ सप्टेंबर,२००१

संदर्भ :- १) शासन निर्णय, सा.प्र.वि., क्र.पअंक-१०९७/१७९३/प्र.क्र.४/९८/१६-अ, दि.१९.३.९८.
२) शासन निर्णय, सा.प्र.वि., क्र.पअंक-१०९७/१७९३/प्र.क्र.४/९८/१६-अ, दि.२०.५.९८.
३) शासन निर्णय, सा.प्र.वि., क्र.पअंक-१०९७/१७९३/प्र.क्र.४/९८/१६-अ, दि.२३.९.९८.

**शासन निर्णय**

पदविधर/पदविकाधारक सुशिक्षित बेरोजगारांना आर्थिक सहाय्य योजनेअंतर्गत शासकीय सेवांमध्ये अर्धवेळ काम केलेल्या उमेदवारांना शासकीय सेवेत नियुक्ती मिळण्यासाठी संदर्भाधिन क्र.१ च्या आदेशान्वये काही सवलती देण्यात आल्या आहेत. यापैकी कमाल वयोमर्यादेत देण्यात आलेल्या सवलतीमध्ये सुधारणा करावी, असा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

२. यासंदर्भात शासनाचे असे आदेश आहेत की, पदविधर/पदविकाधारक सुशिक्षित बेरोजगारांना शासकीय सेवेतील गट-क च्या पदावरील नियुक्तीसाठी उच्च वयोमर्यादा सरसकट ४५ वर्षापर्यंत शिथिल करण्यात यावी. ही सवलत रोजगार व स्वयंरोजगार विभागाकडे असलेल्या सदर उमेदवारांच्या यादीतील ४२११ उमेदवारांपुरतीच मर्यादित राहील. त्यामुळे या विभागाच्या संदर्भाधिन क्र.१ च्या आदेशानुसार [परि.२ (अ) प्रमाणे] देण्यात आलेल्या "कमाल वयोमर्यादेतील सवलती" या आदेशाच्या दिनांकापासून वरील ४२११ उमेदवारांकरिता आपोआप रद्द होतील.

३. या सवलती महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कक्षेबाहेरील गट-क च्या पदावरील सरळ सेवा भरतीसाठी लागू राहतील. ज्या प्रकरणी नियुक्तीची कार्यवाही चालू असेल त्या प्रकरणी हे आदेश लागू होणार नाहीत.

४. हे आदेश शासकीय/निमशासकीय सेवा, मंडळे/महामंडळे, नगरपालिका/महानगरपालिका, जिल्हा परिषदा, शासकीय अनुदानप्राप्त संस्था, आणि ज्यांना मार्गदर्शक आदेश देण्याचा अधिकार शासनाला आहे, अशी इतर सर्व प्राधिकरणे, सेवा व संस्था यांना लागू राहतील.

५. महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( शैला तारगे पाटील )
सहसचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

राज्यपाल यांचे सचिव,
मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
उपमुख्यमंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री,राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,

E.U.letter/23
- ४७९ (५०००-०९-०१)

क्र.मा.प.

मुख्य सचिव,
शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
* प्रबंधक,उच्च न्यायालय,मूळ न्याय शाखा,मुंबई,
* प्रबंधक,उच्च न्यायालय,अपील शाखा,मुंबई,
* प्रबंधक,महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण,मुंबई,
* प्रबंधक,लोकआयुक्त व उप लोकायुक्त,मुंबई,
* सचिव,महाराष्ट्र लोकसेवा आयोग,मुंबई,
* सचिव,महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय,विधानभवन,मुंबई,
* सचिव,राज्य निवडणूक आयोग,
सर्व विभागीय आयुक्त,
राज्यातील सर्व महामंडळे आणि उपक्रम यांचे व्यवस्थापकीय संचालक ,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व महापालिकांचे आयुक्त,
सर्व जिल्हापरिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व मुख्याधिकारी. नगर परिषदा/नगरपालिका,
संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय,मंत्रालय,मुंबई
उप सचिव,रोजगार व स्वंय रोजगार विभाग,नवीन प्रशासकीय भवन,१४ वा मजला,मुंबई-३२.
सर्व मंत्रालयीन विभाग,
मंत्रालयीन विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख / कार्यालय प्रमुख,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासन
निवड नस्ती.

पत्रान.